नल जल मित्र कार्यक्रमांतर्गत मल्टी स्किलिंग आर.पी. एल. मॉडेल प्रशिक्षण कार्यक्रमास निधी वितरित करणेबाबत (लेखाशीर्ष २२१५ २०८२)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जजीमि-२०२४/प्र.क्र.३४९/पापु-१०**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख : १९ मार्च, २०२५

**वाचा-**

१) केंद्र शासनाचे पत्र क्र. W-११०११/६/२०२३-JJM-१११-DDWS, did. १२/०९/२०२३

२) केंद्र शासनाचे पत्र क्र. W-११०११/६/२०२३-JJM-१११-DDWS, did. ११/०८/२०२३

३) राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या शिखर समितीचे इतिवृत्त दि. ३०.०१.२०२४

४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र. जजीम २०२४/प्र.क्र.३४९/पापु.१० दिनांक १९ जून, २०२४

५) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र. बजेट २०२४/प्र.क्र.३७२/पापु.१० दिनांक ७ मार्च, २०२५

**प्रस्तावना-**

जल जीवन मिशन अंतर्गत नल जल मित्र कार्यक्रम राबविण्याबाबत संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये केंद्र शासनाचे निर्देश प्राप्त आहेत तसेच संदर्भाधीन क्र. (२) येथील केंद्र शासनाच्या पत्रान्वये नल जल मित्र कार्यक्रमाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने मार्गदर्शक सुचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. ग्रामपंचायत स्तरावर कुशल मनुष्यबळ उपलब्ध होण्याच्या अनुषंगाने बहुकौशल्यावर आधारित प्रशिक्षण उपक्रम राबविण्याचा नल जल मित्र कार्यक्रमाचा प्रमुख उद्देश आहे. तसेच नल जल मित्र कार्यक्रमाच्या अंमलबजावणीमुळे ग्रामीण भागांमध्ये पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीच्या अनुषंगाने प्लंबिंग, विद्युत कामे, गवंडीकाम, पंपदुरुस्ती इत्यादी कौशल्ये असणारे बहुकुशल स्थानिक स्तरावरील मनुष्यबळ निश्चितपणे उपलब्ध होऊ शकते. सदर कार्यक्रमांतर्गत प्रशिक्षण देण्याच्या अनुषंगाने ग्रामपंचायतीमार्फत स्थानिक व्यक्तींचे नामनिर्देशन करावयाचे आहे. तसेच, राज्य पाणी व स्वच्छता मिशनमार्फ़त या सदस्यांच्या प्रशिक्षणाबाबत आवश्यक कार्यवाही करावयाची आहे. याअनुषंगाने संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये नल जल मित्र कार्यक्रमाअंतर्गत मल्टी स्किलिंग आर.पी.एल. मॉडेल प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याकरीता प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

राज्यात जल जीवन मिशन अंतर्गत नल जल मित्र कार्यक्रम राबविणेकरिता संदर्भ क्र. ३ येथील इतिवृत्तान्वये राज्य पाणी व स्वच्छता मिशन अंतर्गत शिखर समितीची मान्यता प्राप्त आहे. त्यानुसार सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये लेखाशीर्ष २२१५ २०८२ खाली रु. ४०.०० कोटी इतका निधी पुरवणी मागणीव्दारे विभागास उपलब्ध करुन दिला आहे.

राज्यामध्ये जल जीवन मिशन कार्यक्रमाच्या माध्यमातून मोठ्या प्रमाणात पाणी पुरवठा योजना पूर्णत्वाकडे जात आहेत, सदरच्या योजनांची देखभाल व दुरुस्तीची प्रभावीपणे अंमलबजावणी होण्याकरीता ग्रामस्तरावर कुशल मनुष्यबळ उपलब्ध होणे आवश्यक आहे. त्याकरीता नल जल मित्र कार्यक्रमांतर्गत रु. ४०.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

जल जीवन मिशन अंतर्गत नल जल मित्र कार्यक्रम राबविणेकरिता ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्ती खर्चासाठीचे लेखाशीर्ष "मागणी क्र. वाय ०२, लेखाशिर्ष (२२१५ २०८२), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) खाली सन २०२४-२०२५ या वर्षात रु. ४०.०० कोटी (अक्षरी-रु. चाळीस कोटी फक्त) इतका निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांना “अभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक” (VPDAA) या कार्यप्रणालीअंतर्गत वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका या मधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या दि. १४ फेब्रुवारी, २०२४ च्या शासन निर्णयात दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच सदरचा निधी विनियोग ठरवून दिलेल्या बाबींकरिता करण्याची जबाबदारी मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन व अंमलबजावणी यंत्रणांची राहील. नल जल मित्र कार्यक्रमांतर्गत वितरीत निधी जल जीवन मिशन अंतर्गत आतापर्यंत कार्यान्वित झालेल्या योजनांकरीताच विनियोग होईल याची राज्य पाणी व स्वच्छता मिशन व अंमलबजावणी यंत्रणांनी दक्षता घेवून सदर कार्यक्रमांतर्गत खर्च करताना संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर शासन निर्णय अनौपचारिक संदर्भ क्र.१३३व्यय-०३, दि.१७.०३.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१९१२१७५१७९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA GORAKH BHARATE

Digitally signed by RAVINDRA GORAKH BHARATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD232EB47EB633CB760C7BD2ACF421B01B1DA040DC965254760018B5F4E33BE5, cn=RAVINDRA GORAKH BHARATE
Date: 2025.03.19 12:41:09 +05'30'

(रविंद्र भराटे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
६. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
७. प्रधान महालेखापाल (लेखा व परिक्षा)-१ महाराष्ट्र, मुंबई.
८. प्रधान महालेखापाल (लेखा व परिक्षा) -२ महाराष्ट्र नागपूर.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२ महाराष्ट्र नागपूर.
१०. सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१२. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
१३. उप सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. अवर सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. लेखाधिकारी, राज्य पाणी व स्वच्छता मिशन बेलापूर, नवी मुंबई.
१६. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवडनस्ती- कार्यासन पापु १०